**मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पाच्या कार्यान्वयन देखभाल दुरुस्तीच्या (Operation & Maintenance) ८ व्या वर्षाच्या कालावधीसाठी येणाऱ्या रुपये १२८,९७,५४,६६१/- (जीएसटी सह) खर्चास प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-१०२२/प्र.क्र.११९/पोल-३**

गृह विभाग, दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०००३२

दिनांक:२५/०३/२०२५

---

**संदर्भ:**

१. शासन निर्णय क्र. आयएसएस १००९/प्र.क्र. ३१३/विशा-४, गृह विभाग, दि.२७.०७.२०११.
२. शासन निर्णय क्र. आयएसएस-१००९/प्र.क्र. ३१३ (भाग-२)/विशा-४, गृह विभाग, दि.०६.०१.२०१२.
३. महाराष्ट्र शासन व मेसर्स लार्सन अँड टुब्रो लिमिटेड यांच्यात दि.०७.०२.२०१५ रोजी झालेला करार.
४. शासन आदेश क्र. सीसीटीव्ही ३११५/प्र.क्र. २१/पोल-३, दि. ०७.०२.२०१५ चे कार्यादेश
५. शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२,दि.१७.०४.२०१५.
६. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र. ७५/अर्थ-३, वित्त विभाग, दि.१८.०४.२०१७.
७. शासन निर्णय क्र. सुरक्षा-२०१५/प्र.क्र. ६४/विशा-३(अ), गृह विभाग, दि.०४.०८.२०१७.
८. गृह विभाग पत्र क्र. ३११५/प्र.क्र. २१/भाग-२/ पोल -३, दि.०८.११.२०१७.
९. शासन निर्णय क्र. सीसीटीव्ही-३११५/प्र.क्र. २१/भाग-२/ पोल -३, गृह विभाग, दि.०५.११.२०१८.
१०. शासन निर्णय क्र. सीसीटीव्ही-३११५/प्र.क्र. २१/भाग-२/ पोल -३, गृह विभाग, दि.२६.०२.२०१९.
११. उच्चस्तरीय समितीच्या २२.०९.२०२२ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त, दि.२०.१०.२०२२.
१२. गृह विभाग पत्र क्र. एमआयएस ३६१९/सी.आर.६६/ पोल -३, दि. १९.१०.२०२२.
१३. गृह विभाग पत्र क्र.संकीर्ण १०२२/सी.आर.११९/पोल-३ दि. २२.२.२०२४
१४. उच्चस्तरीय समितीच्या १६.१.२०२४ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त, दि. ७.२.२०२४.
१५. उच्चस्तरीय समितीच्या १३.०२.२०२५ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त, दि.०३.०३.२०२५.
१६. पोलीस उप आयुक्त (अभियान), मुंबई यांचे पत्र जा.क्र.पोउआ/अभियान/७५२/२०२५, दि.२०.३.२०२५

---

**प्रस्तावना:**

महाराष्ट्र शासनाने मुंबई शहरात सुरक्षा उद्देशाने सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यासाठी दि.०७.०२.२०१५ रोजी मेसर्स लार्सन अँड टुब्रो लिमिटेड या कंपनीसोबत करार केला. या करारानुसार, शासन निर्णय दि. ०५.११.२०१८ अन्वये, मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पाच्या पहिल्या टप्प्यासाठी रु.९८०,३३,८०,०२४/- (नऊशे ऐंशी कोटी तेहेतीस लाख ऐंशी हजार चोवीस) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तद्नंतर, शासन निर्णय दि.२६.०२.२०१९ अन्वये,मुंबई शहर सीसीटीव्ही

प्रकल्प टप्पा १ व टप्पा २ या दोन्ही प्रकल्पास रुपये १३०३.५६ कोटी (एक हजार तीनशे तीन कोटी छप्पन्न लाख) इतक्या खर्चास मान्यता देण्यात आलेली आहे.

उच्चस्तरीय शक्तीप्रदान समितीच्या बैठकीमधील निर्णयाच्या अनुषंगाने मुंबई शहर सीसीटीव्ही टप्पा १ हा प्रकल्प दि.०५.०९.२०१७ पासून कार्यान्वित (Go-Live) झाला असे दि.०८.११.२०१७ च्या पत्रान्वये घोषित करण्यात आले आहे.

मुंबई सीसीटीव्ही टप्पा १ या प्रकल्पाचा कार्यान्वयन देखभाल दुरुस्ती कालावधी (operation & Maintenance) दि.४/९/२०२२ रोजी पूर्ण झाला आहे. उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या संदर्भाधीन क्र.११ दि.२२/९/२०२२ रोजीच्या बैठकीत, मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या कार्यान्वयन देखभाल दुरुस्तीसाठी (operation & Maintenance) मे.एल अँड टी कंपनी यांना एका वर्षासाठी दि.४ सप्टेंबर, २०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यास मंजूरी देण्यात आली आहे. मे. लार्सन ॲन्ड टुब्रो लि. या कंपनीसोबत दि.०७.०२.२०१५ रोजी शासनाने केलेल्या कराराच्या अनुषंगाने अटी शर्तीवर सदर मुदतवाढ देण्यात आल्याचे तसेच पुढील एक वर्ष कालावधीसाठी forecast of price सादर करण्याबाबत प्रकल्पाचे सिस्टीम इंटिग्रेटर, मे.एल ॲड टी कंपनी यांना संदर्भाधीन क्र.१२, दि.१९/१०/२०२२ च्या पत्रान्वये कळविण्यात आले. त्यावर त्यांनी पुढील एक वर्ष कालावधीसाठीचे forecast of price सादर केले. त्यानंतर पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली दि.१/२/२०२३ व दि.२३/२/२०२३ रोजी प्रकल्प अंमलबजावणी समितीची (PIC) बैठक झाली. सदर बैठकीमध्ये झालेल्या निर्णयानुसार, दि. १४/३/२०२३ रोजी उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीची बैठक आयोजित करण्यात आली. बैठकीमध्ये मे.एल अँड टी कंपनी यांना मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पाचा कार्यान्वयन देखभाल दुरुस्तीच्या (operation & Maintenance) ६ व्या वर्षासाठी दि.५/९/२०२२ ते दि.४/९/२०२३ या कालावधीकरिता रु.९०,३५,५८,९९३/- (जीएसटी वगळून) इतक्या खर्चास मान्यता दि.२९.३.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये देण्यात आली. तद्नंतर उच्चस्तरीय समितीच्या दि.१६.१.२०२४ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार शासन पत्र दि.२२.२.२०२४ रोजीच्या पत्रान्वये सध्याच्या दरानुसार कोणत्याही खर्चात वाढ न करता दि.५.९.२०२३ ते दि.४.९.२०२४ या कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात आली.

आता दि.१३.२.२०२५ रोजी मा. अ.मु.स.(गृह) यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झालेल्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीत मेसर्स लार्सन अँड टुब्रो लिमिटेडच्या कार्यान्वयन देखभाल दुरुस्तीच्या (operation & Maintenance) कराराचा कालावधी वाढविण्याचा व ८व्या वर्षासाठीच्या कार्यान्वयन देखभाल दुरुस्तीच्या (operation & Maintenance) करिता **रु.१२८,९७,५४,६६१/- (जीएसटी सह)** इतक्या खर्चास मान्यता देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन मान्यता देण्यात येत आहे.

---

**<u>शासन निर्णय:</u>**

अ.मु.स.(गृह) यांच्या अध्यक्षतेखाली दि.१३.२.२०२५ रोजी संपन्न झालेल्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीत मेसर्स लार्सन अँड टुब्रो लिमिटेडच्या कार्यान्वयन देखभाल दुरुस्तीच्या (operation & Maintenance) कराराचा कालावधी दि.०४.०९.२०२५ पर्यंत वाढविण्याचा निर्णय घेतला. या ८व्या वर्षासाठीच्या कार्यान्वयन देखभाल दुरुस्ती (operation & Maintenance) करिता **रु.१२८,९७,५४,६६१/- (जीएसटी सह)** इतक्या खर्चास खालील अटी व शर्तीसह प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. (१) L&T has to maintain the setup of the Mumbai City Surveillance Project until 4th September 2025 or until the completion of one-quarter of hand-holding support following the on boarding of a new vendor, whichever occurs earlier as per the terms and conditions of the original contract and ensure the smooth functioning of the system.

(२) यासाठी होणारा खर्च हा "मागणी क्र.बी-१०, ४०५५ पोलीस यावरील भांडवली खर्च, ८०० इतर खर्च, (००) (०९) सीसीटीव्ही यंत्रणा बसविणे (४०५५ ०२२३) या अंतर्गत ५२- यंत्रसामग्री साधनसामग्री" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या-त्या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात

(३) हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या अधिकृत संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in येथे डिजिटल संदर्भ क्रमांक २०२५०३२५१८५७०१२३२९ सोबत उपलब्ध आहे व डिजिटल स्वाक्षरीत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने,

RAJENDRA TANAJI BHALWANE

Digitally signed by RAJENDRA TANAJI BHALWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=38d121bf4a170d16dacf98520f0ac44551976931d27581 48ccaa24d1fb27b9df, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BADFC0DAA40CC485400AAD9CEABCD51409565 9A6CDFAC856815518DCD188C23A, cn=RAJENDRA TANAJI BHALWANE
Date: 2025.03.25 18:57:52 +05'30'

**(रा.ता. भालवणे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन,**

**प्रत:**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
७. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८. महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपुर.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११. मे. लार्सन अँड टुब्रो कं. लि, एल अँड टी हाऊस, एन. एम. मार्ग, बलार्ड इस्टेट, मुंबई-१.
१२. वित्त विभाग, व्यय-७/वित्तीय सुधारणा, मंत्रालय, मुंबई
१३. क.अ.अर्थ-१/गृह विभाग, मंत्रालय मुंबई.
१४. निवडनस्ती, पोल-३.